**श्री.श्रीकांत देशमुख, विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था यांना सहनिबंधक सहकारी संस्था या सवंर्गात पदोन्नतीचा मानीव दिनांक मंजूर करण्याबाबत..............**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.राजस-२०२०/प्र.क्र.१४९/५स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- १८ ऑक्टोबर, २०२१

**वाचा :-** १. शासन निर्णय क्र.राजस-१७०१/३८२६/प्र.क्र.१९३/५स, दि.१८/३/२००८

२. शासन निर्णय क्र.राजस-१००९/प्र.क्र.११५/५स, दि.२५/५/२०१०

३. शासन निर्णय क्र.राजस-१७१२/प्र.क्र.३१६/५स, दि.१४/९/२०२०

**प्रस्तावना :-**

श्री.एस.एस.देशमुख (खुला) व श्री.व्ही.व्ही.रसाळ (खुला) यांची सरळसेवेने उपनिबंधक, सहकारी संस्था या संवर्गात नियुक्ती करण्यात आली. त्यानुसार श्री.देशमुख हे सदर पदावर दि.२७/७/१९९३ तर श्री.रसाळ हे दि.१६/७/१९९३ रोजी रूजू झाले. उपनिबंधक, सहकारी संस्था या संवर्गाच्या दि.१/१/२००८ रोजीच्या प्रारुप सेवाजेष्ठता यादीनुसार श्री.देशमुख यांचे नाव अ.क्र.६ वर तर श्री.रसाळ यांचे नाव अ.क्र.७ वर समाविष्ठ आहे. त्यावरुन श्री.देशमुख हे श्री.रसाळ यांना सेवाजेष्ठ असल्याचे दिसून येत आहे.

विभागीय पदोन्नती समितीच्या दि.८/१०/२००९ च्या बैठकीत सन २००८-०९ च्या सहनिबंधक सहकारी संस्था या पदावरील पदोन्नतीसाठीच्या निवडसूचीकरीता श्री.देशमुख यांची पात्रता तपासण्यात आली असून त्यांना उक्त निवडसूचीतून पदोन्नतीसाठी पात्र ठरविण्यात आले होते. तथापि, श्री.देशमुख यांची विभागीय चौकशी प्रकरणी दि.१८/३/२००८ अन्वये पुढील वेतनवाढ ५ वर्षाकरीता कायम रोखण्याच्या शिक्षेची अंमलबजावणी सुरु असल्याने श्री.देशमुख यांना सेवाजेष्ठेत कनिष्ठ असलेले श्री.रसाळ यांना सहनिबंधक सहकारी संस्था या पदावर शासन निर्णय दि.२१/५/२०१०अन्वये पदोन्नती देण्यात आली.

श्री.देशमुख यांनी त्यांच्या दि.१८/३/२००८ च्या शिक्षेविरुध्द मा.राज्यपाल महोदयांकडे केलेल्या अपिलाच्या अनुषंगाने दि.२८/३/२०१२ च्या आदेशान्वये श्री. देशमुख यांची पुढील वेतनवाढ ५ वर्षाकरीता कायम रोखण्याच्या शिक्षेऐवजी त्यांची पुढील वेतनवाढ ४ वर्षाकरीता कायम रोखण्याची सुधारित शिक्षा बजावण्यात आली.

सदर दि.१८/३/२००८ च्या आदेशाविरुध्द श्री.देशमुख यांनी मा.मॅट मुंबई यांच्याकडे दाखल केलेल्या मुळ अर्ज क्र.१०८७/२०१२ प्रकरणी मा.न्यायाधिकरणाने दि.७/४/२०१५ अन्वये श्री.देशमुख यांचे शिक्षेचे आदेश रद्द करुन प्रकरण शासनाकडे पुनर्विचारार्थ पाठविले.

मा.मॅट मुंबई यांच्या दि.७/४/२०१५ च्या आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.१२६७५/२०१८ प्रकरणी दि.१८/२/२०१९ रोजी दिलेल्या न्याय निर्णयानुसार श्री.देशमुख यांच्या शिक्षेच्या पुर्नविचारार्थ प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता.

त्यानुषंगाने शासनाच्या दि.१४/९/२०२० अन्वये श्री.एस.एस.देशमुख यांची वेतनवाढ चार वर्षाकरीता रोखण्याची यापूर्वी दिलेली शिक्षा कमी करुन ती एक वर्षाकरीता रोखण्यात यावी असे आदेश निर्गमित करण्यात आले. श्री.देशमुख यांच्यावर दि.१८/३/२००८ अन्वये त्यांची पुढील वेतनवाढ ५ वर्षाकरीता कायम रोखण्यात यावी ही शिक्षा बजावण्यात आली होती. श्री.देशमुख यांच्यावर दि.१८/३/२००८ अन्वये बजावण्यात आलेल्या शिक्षेची अंमलबजावणी सुरु असल्याने, त्यांना सन २०१० मध्ये उपनिबंधक, सहकारी संस्था या संवर्गातून सहनिबंधक, सहकारी संस्था या संवर्गात पदोन्नती देण्यात आली नव्हती. आता, श्री.देशमुख यांची शिक्षा कमी करुन ती एक वर्षाकरीता रोखण्यात यावी ही शिक्षा दि.१४/९/२०२० अन्वये बजावण्यात आल्यामुळे, त्यांच्या शिक्षेची अंमलबजावणी दि.१/७/२००९ रोजी पूर्ण झाली आहे.

श्री.देशमुख यांनी त्यांच्या शिक्षेची अंमलबजावणी दि.१/७/२००९ रोजी पूर्ण झाल्याने सन २०१० मध्ये उपनिबंधक, सहकारी संस्था या संवर्गातून सहनिबंधक, सहकारी संस्था या संवर्गात पदोन्नतीचा मानीव दिनांक मिळण्याची विनंती केली आहे.

वरील वस्तुस्थिती विचारात घेऊन, श्री.श्रीकांत देशमुख यांना कनिष्ठ असलेले परंतु त्यांच्या अगोदर सहनिबंधक सहकारी संस्था गट-अ या संवर्गात पदोन्नत झालेले श्री.विकास रसाळ हे सहनिबंधक, सहकारी संस्था या पदोन्नतीच्या पदावर रूजू झाल्याचा दि.१/६/२०१० हा दिनांक मानीव दिनांक म्हणून मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

विभागीय पदोन्नती समितीच्या दि.८/१०/२००९ च्या बैठकीत सन २००८-०९ च्या सहनिबंधक सहकारी संस्था या पदावरील पदोन्नतीसाठीच्या निवडसूचीकरीता श्री.देशमुख यांची पात्रता तपासण्यात आली असून त्यांना उक्त निवडसूचीतून पदोन्नतीसाठी पात्र ठरविण्यात आले होते. तथापि, श्री.देशमुख यांची विभागीय चौकशी प्रकरणी दि.१८/३/२००८ अन्वये पुढील वेतनवाढ ५ वर्षाकरीता कायम रोखण्याच्या शिक्षेची अंमलबजावणी सुरु असल्याने श्री.देशमुख यांना सेवाजेष्ठेत कनिष्ठ असलेले श्री.रसाळ यांना सहनिबंधक सहकारी संस्था या पदावर शासन निर्णय दि.२१/५/२०१०अन्वये पदोन्नती देण्यात आली.

शासनाच्या दि.१४/९/२०२० अन्वये श्री.एस.एस.देशमुख यांची वेतनवाढ रोखण्याची यापूर्वी दिलेली शिक्षा कमी करुन ती एक वर्षाकरीता रोखण्यात यावी असे आदेश निर्गमित करण्यात आले. श्री.देशमुख यांच्यावर दि.१८/३/२००८ अन्वये बजावण्यात आलेल्या शिक्षेची अंमलबजावणी सुरु असल्याने, त्यांना सन २०१० मध्ये उपनिबंधक, सहकारी संस्था या संवर्गातून सहनिबंधक, सहकारी संस्था या संवर्गात पदोन्नती देण्यात आली नव्हती. आता, श्री.देशमुख यांची शिक्षा कमी करुन ती एक वर्षाकरीता रोखण्यात यावी ही शिक्षा दि.१४/९/२०२० अन्वये बजावण्यात आल्यामुळे, त्यांच्या शिक्षेची अंमलबजावणी दि.१/७/२००९ रोजी पूर्ण झाली आहे. त्यानुसार श्री.श्रीकांत देशमुख यांना सहनिबंधक सहकारी संस्था गट-अ या पदावरील पदोन्नतीचा दि.१/६/२०१० हा मानीव दिनांक मंजूर करण्यात येत आहे.

२. श्री.श्रीकांत देशमुख यांना सहनिबंधक सहकारी संस्था गट-अ या पदावरील दि.१/६/२०१० हा मानीव दिनांक केवळ ज्येष्ठतेसाठी प्रदान करण्यात येत आहे.

**३.** श्री.श्रीकांत देशमुख यांना सहनिबंधक, सहकारी संस्था या पदावरील मंजूर केलेला दि.१/६/२०१० हा मानीव दिनांक, ते त्यांना सहनिबंधक, सहकारी संस्था या पदावर देण्यात आलेल्या पदोन्नतीच्या अनुषंगाने ते सदर पदावर प्रत्यक्ष रूजू झाल्याचा दिनांका पर्यंत त्यांची काल्पनिक वेतननिश्चिती करण्यात यावी. तसेच दि.१/६/२०१० हा मानीव दिनांक, ते श्री.देशमुख यांना सहनिबंधक, सहकारी संस्था या पदावर देण्यात आलेल्या पदोन्नतीच्या अनुषंगाने श्री.देशमुख सदर पदावर प्रत्यक्ष रूजू झाल्याच्या दिनांकापासून या कालावधीतील काल्पनिक वेतननिश्चितीच्या अनुषंगाने वेतन व भत्त्यांची थकबाकी, श्री.देशमुख यांना अनुज्ञेय राहणार नाही.

**४.** हे आदेश संबंधित वर्षाच्या निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता प्राप्त होण्याच्या अधीन तसेच सामान्य प्रशासन विभाग अनौ.संदर्भ क्र.६५८/का.१२, दि.१६/७/२०२१ व वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.२५९/२१/सेवा-३, दि.५/८/२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्यांचा संकेतांक क्रमांक २०२११०१८१४४१३४५९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pallavi Kishor Kolekar

Digitally signed by Pallavi Kishor Kolekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ba35d79c9fe547ea6b606f742ced2d6ebfd2c68412e49f5edac040ea7952ed5d, serialNumber=e01062e9c78c4616d627a8cf0a5b109edc1a71f9a6cd0f92b84ddfcfc6c858ac, cn=Pallavi Kishor Kolekar
Date: 2021.10.18 14:43:02 +05'30'

**(पल्लवी कोळेकर)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा व हकदारी/लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.

३. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

४. श्री.श्रीकांत देशमुख, सहनिबंधक सहकारी संस्था द्वारा :- सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

५. निवडनस्ती.